भारतीय वन सेवेतील (२०१३ बॅच) अधिकाऱ्यांकरिता सहाय्यक वनसंरक्षकाचे अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत..........

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.आयएफएस-१२१४/प्र.क्र.१६६/फ-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २१ जुलै, २०१५

<u>**पहा:-**</u> प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.भावसे/मेंटर-३/प्र.क्र.६५(१४-१५)/कक्ष-९/६२५/१५-१६,दिनांक:- ०४/०६/२०१५.

<u>**शासन निर्णय:-**</u>

भारतीय वन सेवेतील सन २०१३ च्या बॅचमधील महाराष्ट्र संवर्गाचे अधिकारी हे इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून येथील प्रशिक्षण पूर्ण करून दिनांक ०१/०९/२०१५ रोजी कार्यमुक्त होऊन सरळ राज्य शासनाच्या सेवेत रूजू होणार आहेत. त्यांच्याकरिता कनिष्ठ समय श्रेणीत (रू.१५,६००-३९,१००+ग्रेड पे ५,४००) खालील प्रमाणे सहाय्यक वनसंरक्षकाची पाच अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहेत. सदर अधिसंख्य पदे अधिकारी रूजू झाल्याच्या दिनांकापासून एक वर्षाच्या कालावधीसाठी अस्तित्वात राहतील.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | विभागाचे नाव | वनवृत्त |
|---|---|---|---|
| १ | श्री. टी.आर. चव्हाण | गोंदिया वन विभाग | नागपूर |
| २ | सुश्री. विनीता व्यास | गडचिरोली वन विभाग | गडचिरोली |
| ३ | श्री. ए.डी. मुंढे | भंडारा वन विभाग | नागपूर |
| ४ | श्री. अनंत शंकर | डहाणू वन विभाग | ठाणे |
| ५ | श्री. जयारम्मे गौडा आर. | पूर्व मेळघाट वन विभाग | अमरावती |

उक्त अधिकारी हे रूजू झाल्याच्या दिनांकापासून ते पुढील एक वर्षाच्या कालावधीकरिता सदर पदावरील वेतन व भत्त्यापोटी येणारा खर्च प्रधानशिर्ष <u>**"मुख्य लेखाशिर्ष २४०६-वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), १०१ वनसंधारण व विकास, १०१ (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) ०१-वेतन"**</u> या लेखाशिर्षा खाली सन २०१५-१६ या वर्षात उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ११/०७/२०१२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०७२११३०३४८८६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.07.21 13:08:00 +05'30'

**(वीरेंद्र तिवारी)**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) संचालक, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, डेहराडून.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), पुणे.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे.
६) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर/गडचिरोली/ठाणे/अमरावती.
७) उप वनसंरक्षक (प्रादेशिक), गोंदिया/गडचिरोली/भंडारा/डहाणू/पूर्व मेळघाट.
८) कोषागार अधिकारी, नागपूर/गडचिरोली/ठाणे/अमरावती.
९) सहा. संचालक, भावसे (लेखा) कक्ष, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) १.श्री. टी.आर. चव्हाण, २. सुश्री. विनीता व्यास, ३. श्री. ए.डी. मुंढे, ४. श्री. अनंत शंकर, ५. श्री. जयारम्मे गौडा आर. १ ते ५ सर्व भावसे, सहाय्यक वनसंरक्षक यांना व्दारा प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११) निवड नस्ती, फ-७, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.